वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (म.) मुंबई या महामंडळास रु.३००.०० कोटी सहायक अनुदान पुढील तीन वर्षामध्ये उपलब्ध करुन देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : वनामं २०१७/प्र.क्र.८७/महामंडळे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष (१) वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना (रुपये १०.०० लाखापर्यंत) आणि (२) गट कर्ज व्याज परतावा योजना (रुपये १०.०० लाख ते रु. ५०.०० लाखापर्यंत) या योजना वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (म.) मुंबई या महामंडळामार्फत राबविण्यास व या महामंडळामार्फत इतर योजना राबविण्यासाठी पुढील ३ वर्षामध्ये रुपये ३००.०० कोटी सहायक अनुदान मंजूर करण्याच्या प्रस्तावास मा. मंत्रिमंडळाने दिनांक१५/०१/२०१९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये पुढीलप्रमाणे मान्यता दिलेली आहे -

" १) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष योजना (१) वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना (रुपये १०.०० लाख पर्यंत) आणि (२) गट कर्ज व्याज परतावा योजना (रुपये १०.०० लाख ते रु. ५०.०० लाखपर्यंत) वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळामार्फत राबविण्यास मान्यता देण्यात येत असून त्यासाठी महामंडळास रुपये ३००.०० कोटी इतके सहायक अनुदान पुढील तीन वर्षामध्ये उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर अनुदानातुन वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (म.) या महामंडळास, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष (१) वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना (बँकेमार्फत) (कर्ज मर्यादा रु. १०.०० लाखापर्यंत), (२) गट कर्ज व्याज परतावा योजना (बँकेमार्फत) (कर्ज मर्यादा रुपये १०.०० लाख ते रुपये ५०.०० लाख) या दोन्ही योजनांसाठी प्रत्येकी रुपये ५०.०० कोटी याप्रमाणे रुपये १००.०० कोटी इतके सहायक अनुदान खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) वरील सहायक अनुदानातुन रामोशी व इतर समाजाच्या लोकांच्यासाठी विशेष योजना , तसेच, वडार व पारधी समाजातील लोकांच्यासाठी विशेष योजना राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) सदरहू योजना महामंडळामार्फत नव्याने राबविण्यात येत असल्याने या योजनेवरील खर्चाची तरतुद करण्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. "

मा.मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

(१) शासन याद्वारे, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष योजना (१) बँकेमार्फत घेतलेल्या वैयक्तिक कर्जावरील व्याज परतावा योजना (रुपये १०.०० लाखापर्यंत) आणि (२) बँकेमार्फत घेतलेल्या गट कर्ज व्याज परतावा योजना (रुपये १०.०० लाख ते रु. ५०.०० लाखापर्यंत) या योजना वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (म.) मुंबई या महामंडळामार्फत राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच इतर योजना राबविण्यासाठी या महामंडळास रुपये ३००.०० कोटी सहायक अनुदान मंजूर करण्यास मान्यता देत असून सदरहू सहायक अनुदान पुढील तीन वर्षामध्ये टप्प्याटप्प्याने उपलब्ध करुन देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(२) वरील (१) प्रमाणे मंजूर केलेल्या रुपये ३००.०० कोटी सहायक अनुदानातुन सदर महामंडळास, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष (१) बँकेमार्फत घेतलेल्या वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना (कर्ज मर्यादा रु. १०.०० लाखापर्यत), या योजनेवर रुपये ५०.०० कोटी व (२) बँकेमार्फत घेतलेल्या गट कर्जावरील व्याज परतावा योजना कर्ज मर्यादा रुपये १०.०० लाख ते रुपये ५०.०० लाख) या योजनेकरीता प्रत्येकी रुपये ५०.०० कोटी असे एकूण रुपये १००.०० कोटी सहायक अनुदान खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

(३) वरील अ.क्र. (१) येथील रुपये ३००.०० कोटी मंजूर सहायक अनुदानातुन रु. १००.०० कोटी निधी रामोशी व इतर समाजाच्या लोकांच्या आर्थिक उन्नतीकरीता, तसेच, रु. १००.०० कोटी निधी वडार व पारधी समाजातील लोकांच्या आर्थिक उन्नतीसाठी राखून ठेवण्यास व त्यातून त्या समाजाच्या लोकांच्या आर्थिक उन्नतीकरिता योजना राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(४) सदरहू योजना महामंडळामार्फत नव्याने राबविण्यात येत असल्याने या योजनेवरील खर्चाची तरतुद करण्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** मा.मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेप्रमाणे, सदर योजनेसाठी नविन लेखाशिर्ष प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात यावी.

**०३.** सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक. १५/का.१४१३, दि.१४/०१/२०१९ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक.---,दि.११/०१/२०१९ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११२१६३८२४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2019.01.31 12:27:22 +05'30'

( भा.र.गावित )
**सह सचिव , महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा.विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.मंत्री / राज्यमंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
५. मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
७. अध्यक्ष/ उपाध्यक्ष, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई
८. मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव
९. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
११. सह सचिव/ उप सचिव (महामंडळे), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई
१३. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
१४. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण
१५. महालेखापाल (ले.व अ.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
१६. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई / ठाणे
१८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१९. वित्त विभाग (का-व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई
२०. नियोजन विभाग (का.१४१३), मंत्रालय, मुंबई
२१. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई
२२. सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती महामंडळ
२३. सर्व जिल्हा व्यवस्थापक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती महामंडळ
२४. प्रधान सचिव (विजाभज) यांचे स्वीय सहाय्यक , मंत्रालय, मुंबई
२५. सह सवि (विजाभज) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. निवडनस्ती (महामंडळे) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई